**राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत राज्य शासनाने उपलब्ध करून दिलेल्या भौतिक सुविधा या घटकासाठीची रक्कम संयुक्त खात्यात जमा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: रूसायो २०१६/प्र.क्र.१४७/विशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :**
(१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक : रूसायो २०१६/१४७/विशि-३, दि. २७.०२.२०१८.
(२) राज्य प्रकल्प संचालनालयाचे पत्र क्र. राप्रसं/रुसा/२०१८-१९/५४१, दि. ०६/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना, अभियान स्वरुपात राबविण्याकरिता केंद्र शासनाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना, १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनांमध्ये राबविण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि.२१.०४.२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे.

राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे. या योजनेअंतर्गत अकृषी विद्यापीठे व शासकीय संस्था यांना अनुदान वितरीत करण्याचे केंद्र व राज्याचे प्रमाण ६०:४० असे ठरविण्यात आलेले आहे.

मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि. ०८ डिसेंबर, २०१७ च्या पत्रान्वये राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाअंतर्गत भौतिक सुविधा या घटकासाठी केंद्र हिश्श्यापोटी खालील विद्यापीठांना रु. १८,००,००,०००/- (रूपये अठरा कोटी) इतका निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेल्या सदर निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा म्हणुन ४०% (रु. १२,००,००,०००/-) इतका निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत करणे आवश्यक होते. तथापि, राज्य हिश्श्यापोटी असणाऱ्या लेखाशिर्षामध्ये इतकी तरतुद उपलब्ध नसल्याने सदर लेखाशिर्षामध्ये शिल्लक असलेली रु. ५,३८,००,०००/- एवढी रक्कम संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये संचालनालयास उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील राज्य हिश्श्याची रक्कम पुर्ण करण्याकरिता उर्वरीत रु. ६,६२,००,०००/-एवढी रक्कम या आर्थिक वर्षात राज्य प्रकल्प संचालक,राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि. ०८ डिसेंबर, २०१७ च्या पत्रान्वये राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाअंतर्गत भौतिक सुविधा या घटकासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु. १८,००,००,०००/- (रूपये अठरा कोटी) इतका निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेल्या सदर निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा म्हणुन ४०% (रु. १२,००,००,०००/-) इतका निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत करणे आवश्यक होते.

२. तथापि, राज्य हिश्श्यापोटी असणाऱ्या लेखाशिर्षामध्ये इतकी तरतुद उपलब्ध नसल्याने सदर लेखाशिर्षामध्ये शिल्लक असलेली रु. ५,३८,००,०००/- एवढी रक्कम उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये संचालनालयास उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील राज्य हिश्श्याची रक्कम पुर्ण करण्याकरिता उर्वरीत रु. ६,६२,००,०००/-एवढी रक्कम खाली दिलेल्या तक्त्याप्रमाणे वरिल विद्यापीठांना वितरित करण्याकरिता या आर्थिक वर्षात राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विद्यापीठाचे नाव | केंद्र हिस्सा (६०%) रु. ६,००,००,०००/- | राज्य हिस्सा (४०%) रु. ४,००,००,०००/- | | एकुण वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | शिवाजी विद्यापीठ, कोल्हापु | | आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये वितरित करण्यात आलेली रक्कम | आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये वितरित करावयाची रक्कम | रु.२,३१,००,०००/- |
| | | | रु.१,६९,००,०००/ | रु.२,३१,००,०००/- | |
| २ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | | आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये वितरित करण्यात आलेली रक्कम | आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये वितरित करावयाची रक्कम | रु.२,३१,००,०००/- |
| | | | १,६९,००,०००/- | रु.२,३१,००,०००/- | |
| ३ | मुंबई विद्यापीठ, मुंबई | | आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये वितरित करण्यात आलेली रक्कम | आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये वितरित करावयाची रक्कम | रु.२,००,००,०००/- |
| | | | २,००,००,०००/- | २,००,००,०००/- | |
| | आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये वितरित करावयाची एकुण रक्कम | | | | ६,६२,००,०००/- |

३. या संदर्भात झालेला खर्च सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालयाने सादर केली पाहिजेत.

४. राज्य प्रकल्प संचालनालयास केंद्र शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजुर केलेला आहे त्या निधीचा वापर त्या प्रयोजनासाठी करावा. खरेदी व बांधकामाची मान्यता विद्यापीठ लेखा संहितेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत घेण्यात यावीत.

५. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्या सोबतच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तसेच तद्नंतर वेळोवेळी देण्यात आलेल्या सूचनांनुसार सदरची खरेदी प्रक्रिया विद्यापीठांनी त्यांच्या स्तरावर पार पाडावी व विहित कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

६. सद्य:स्थितीत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, रुसा यांना व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प सहसंचालक, रुसा यांना घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

७. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) व (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि. ३० जून, २०१७ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर दि. १८ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटीची तसेच परिपत्रकातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१५१७४१२८७००८ आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.10.15 17:51:35 +05'30'

(सिध्दार्थ खरात)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.

२) प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठ.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४७१), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
११) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) सह सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.